**ए.आ.वि.प्र., तळोदा अंतर्गत श्री. साईनाथ शिक्षण संस्था, प्रतापपूर, ता. तळोदा, ता. नंदुरबार संचलित अनुदानित आश्रमशाळा, जांभीपाणी, ता. अक्कलुवा, जि. नंदुरबार ही शाळा स्थलांतरीत करुन मौजे रांझणी ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे स्थलांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०२३/प्र.क्र.३०/का-११**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १४ मार्च, २०२३

**वाचा:**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-२००२/प्र.क्र.४९/का.११, दि.२२.०४.२००३
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अतुवा-२०११/प्र.क्र.१४०/का-११, दि. १७.०९.२०११
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-२०१२/प्र.क्र.७०/का-११, दि. १६.०५.२०१२
४) अध्यक्ष, श्री. साईनाथ शिक्षण संस्था, प्रतापपुर, ता. तळोदा, जि. नंदुरबार यांचे पत्र जा.क्र. ०२/२०२२ दि. ११.११.२०२२.
५) प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र., तळोदा, जि. नंदुरबार यांचे पत्र क्र. जा.क्र.अनुआशा-स्थलांतर-२०२२/प्र.क्र.१/का.११५/०३ तळोदा, दि. ०८.१२.२०२२.
६) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.-अनुआशा-२०२२/प्र.क्र./का.११ (२) /२०, नाशिक, दि.०२.०१.२०२३.
७) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. अनुआशा-२०२३/प्र.क्र.३/का.७ (४)/८६३ दि. ०२.०२.२०२३
८) अध्यक्ष, श्री. साईनाथ शिक्षण संस्था, प्रतापपुर, ता. तळोदा, जि. नंदुरबार यांचे पत्र जा.क्र. निरंक दि. २१.०२.२०२३.

**प्रस्तावना-**

श्री. साईनाथ एज्युकेशन सोसायटी, प्रतापपूर संचलित अनुदानित आश्रमशाळा, ओहवा, ता. अक्कलकुवा, जि. नंदुरबार या आश्रमशाळेस दिनांक २२.०४.२००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित उपयोजना क्षेत्रात शासनाने वेळोवेळी काढलेले आदेश, त्यातील नियम, अटी व शर्तीच्या अधीन राहुन नविन अनुदानित आश्रमशाळा सुरु करण्यास परवानगी देण्यात येऊन दिनांक १७.०९.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये इयत्ता १ ते ५ वी च्या अतिरिक्त तुकडयांना मान्यता देण्यात आली. तद्नंतर वेळोवेळी शासनाच्या धोरणानुसार व शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार नैसर्गिक तुकडीवाढीस इयत्ता ६ व ७ वी च्या वर्गास मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर संस्थेने सन २०१२ मध्ये अनुदानित आश्रमशाळा, ओहवा, ता. अक्कलकुवा, जि. नंदुरबार येथील आश्रमशाळेचे मौजे जांभीपाणी, ता. अक्कलकुवा, जि. नंदुरबार येथे स्थलांतरीत करण्याबाबत केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने शासनाने वेळोवेळी काढलेले आदेश, त्यातील

नियम, अटी व शर्तीच्या अधीन राहुन दिनांक १६.०५.२०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली होती.

ए.आ.वि.प्र., तळोदा अंतर्गत श्री. साईनाथ शिक्षण संस्था, प्रतापपूर, ता. तळोदा, ता. नंदुरबार संचलित अनुदानित आश्रमशाळा, जांभीपाणी, ता. अक्कलुवा, जि. नंदुरबार ही शाळा स्थलांतरीत करुन मौजे रांझणी ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे स्थलांतर करणेबाबतचा संदर्भाधीन क्रमांक ६ येथे नमूद पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

ए.आ.वि.प्र., तळोदा अंतर्गत श्री. साईनाथ शिक्षण संस्था, प्रतापपूर, ता. तळोदा, ता. नंदुरबार संचलित अनुदानित आश्रमशाळा, जांभीपाणी, ता. अक्कलुवा, जि. नंदुरबार ही शाळा स्थलांतरीत करुन मौजे रांझणी ता. तळोदा, जि. नंदुरबार येथे स्थलांतर करण्यास खाली नमुद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

१. शाळेच्या पुर्वीच्या ठिकाणी असलेल्या सर्व विद्यार्थ्यांना नवीन ठिकाणी समावून घेण्यात यावे.
२. संस्थेने जुन्या ठिकाणच्या शाळेतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना नवीन ठिकाणी सामावुन घ्यावे.
३. नवीन ठिकाणी शाळेसाठी व वसतीगृहासाठी वेगवेगळी इमारत असावी. सदर इमारतीमध्ये पुरेशी स्नानगृहे, पाणी, शौचालये इ.सोयी-सुविधा उपलब्ध करुन देण्यात याव्यात.
४. विद्यार्थ्यांना अनुज्ञेय असणाऱ्या सोयी-सुविधा व साहित्य इ. चा पुरवठा करण्यात यावा.
५. सदर शाळेतील विद्यार्थ्यांचे नवीन ठिकाणी स्थलांतर संस्थेने स्वत: च्या खर्चाने करावे.
६. स्थानांतर झालेल्या शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.
७. स्थानांतर झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या / मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.
८. शासनाकडून आश्रमशाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन /वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इत्यादी बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश यांचे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.
९. सदर स्थानांतरणा संदर्भात शासनाकडे अथवा आदिवासी विकास विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्याकडे नव्याने तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा स्थानांतर संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास, स्थानांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सर्व बाबी तपासून व आवश्यक असल्यास वरील अटी/शर्ती व्यतिरिक्त अटींचा समावेश करून शाळेचे स्थानांतरणा संदर्भात आवश्यक कार्यवाही करुन त्याबाबत शासनास अवगत करावे.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४१११३४११२०३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2023.04.11 13:46:11 +05'30'

**( उदय गवस )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा, जि. नंदुरबार
५. उप कोषागार अधिकारी, तळोदा.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
८. अध्यक्ष/सचिव, श्री साईनाथ शिक्षण संस्था, प्रतापपूर, ता. तळोदा, जि. नंदुरबार
९. श्री साईनाथ शिक्षण संस्था, प्रतापपूर, ता. तळोदा, जि. नंदुरबार संचलित अनुदानित आश्रमशाळा, जांभीपाणी, ता. अक्कलकुवा, जि. नंदुरबार.